201102041914390001

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक :- अमपा-२७०८/प्र.क्र.२४९/नवि-२६
नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक :- ४ जुलै, २००८

वाचा :- आयुक्त,अमरावती महानगरपालिका यांचे
पत्र क्र. अमनपा/साआवि/६७६/२००७, दि.१९/११/२००७.

**प्रस्तावना:-**

अमरावती महानगरपालिकेची दि. १५.८.८३ रोजी स्थापना झाल्यानंतर नगरपरिषद बडनेराचे कार्यक्षेत्र अमरावती महानगरपालिका मध्ये विलीन झाले. नगरपरिषद बडनेराकडे वैद्यकिय व्यवस्थेकरिता वि. मोदी हॉस्पिटल बडनेरा इमारत मोकळया जागेसह आणि कर्मचारी वर्गासह अमरावती महानगरपालिकेत विलीन झाले. या जागेचा शिट क्र. ६ डी भूखंड क्र. २ शासकीय अभिलेख पी आर कार्ड नोंद सरकार ( फायनांन्सियल सेक्रेटरी यांचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ सीव्हील हॉस्पिटल यांना दिलेले पत्र क्र.सी ६६५/१-२८७ ता. २४.५.१९२४ वरुन बेरार म्यॅन्यूफॅक्चरिंग कंपनी लि. मुंबई चे ताब्यात ) आहे. ही जागा शासकीय असून सध्या अमरावती महानगरपालिकेचे ताब्यात आहे. जागेचे क्षेत्रफळ १४,३३९० चौ. मीटर (१,५४,३४३ चौ. फूट) व त्यावरील बांधकाम अंदाजे ४७७ चौ. मीटर आहे. इमारत जूनी असून निवासस्थाने मोडकळीस आलेली आहे. मोदी हॉस्पिटल बडनेरा येथे बाहयरुग्ण विभाग तसेच सूतिकागृहाची सोय आहे. १२ बेड चे रुग्णालय असून त्यासाठी शासनाचे २ अधिकारी (१ सहा. चिकित्सक वर्ग २ व वैद्यकिय अधि. वर्ग ३ ) प्रतिनियुक्तीवर आहेत. त्यासह महानगरपालिकेचा कर्मचारी वर्ग कार्यरत आहे.

अमरावती महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दि. २९.९.०७ ठराव क्र. १०३ तदनंतर सर्वसाधारण सभा दि. १८.१०.०७ नुसार ठराव क्र. ४४ नुसार "दवाखान्याची इमारत उपलब्ध मोकळ्या जागेसह शासनाकडे वापरासाठी हस्तांतरित करण्याचा ठराव पारीत करुन महानगरपालिकेचे आस्थापनेवरील कर्मचारी व शासनाचे प्रतिनियुक्तीवरील २ अधिकारी बडनेरा स्थित जुनी वस्ती येथील कै. सावित्रीबाई फुले सुतिका गृहासाठी स्थानांतरित करण्याचा" निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांचे उपरोक्त संदर्भिय पत्र व महानगरपालिकेचा ठराव क्र. ४४ दि. १८.१०.०७ लक्षात घेवून अमरावती महानगरपालिकेच्या ताब्यातील १४३३९० चौ.मी. जागेवरील बांधकाम आरोग्य विभागास खालील अटीवर हस्तांतरित करण्यास नगर विकास विभागाची हरकत राहणार नाही.

१) सार्वजनिक आरोग्य विभागाने प्रस्तावित केलेली मोदी हॉस्पिटलची जागा जिल्हाधिकारी अमरावती यांचेकडे आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांनी प्रथमत: वर्ग केली पाहिजे. तदनंतर जिल्हाधिकारी अमरावती हे सदरची जागा सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नांवे करुन देऊ शकतात.

(कृ.मा.प.)

E:\s0nawane\UD26GR

२) मोदी हॉस्पिटलमध्ये सद्या कार्यरत असलेले शासनाचे प्रतिनियुक्तीवरील २ अधिकारी ( १) सहा. चिकित्सक (वर्ग २) व (१) वैद्यकीय अधिकारी (वर्ग ३ )तसेच कायम ठेवून त्यांचेसह महानगरपालिकेचे आस्थापनेवरील कर्मचारी वर्ग जुनी वस्ती स्थित भागात नव्याने बांधण्यात आलेल्या कै. सावित्रीबाई फुले सुतिकागृहासाठी हस्तांतरित करण्यात येईल.

३) मोदी हॉस्पिटल च्या इमारतीमध्ये राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम राबविण्यासाठी असलेले शहरी आरोग्य केंद्र अस्तित्वात असलेल्या ३ खोल्यांमध्ये किंवा उपजिल्हा रुग्णालयातील इमारतीत हलविण्यात येईल.

४) सार्वजनिक आरोग्य विभागाने महसूल विभाग व जिल्हाधिकारी अमरावती यांचेकडून " ना हरकत प्रमाणपत्र" मिळविण्याची कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-

(वि. बा. सुपेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) प्रधान सचिव ( सार्वजनिक आरोग्य विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक
३) सचिव ( नगर विकास) यांचे स्टाफ ऑफिसर
४) विभागीय आयुक्त अमरावती विभाग अमरावती
५) जिल्हाधिकारी अमरावती, यांना पत्र क्र. नझूल/कक्ष-२/प्रस्तु-२/कावि १६२/२००८ दि.२.२.०८ चे संदर्भात
६) आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती
७) वेबकोर्डिनेटर तथा कक्ष अधिकारी/नवि-२९, नगर विकास विभाग यांना सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचे वेबसाईटवर प्रसिध्द करण्यासाठी
८) निवडनस्ती, नवि- २६

## अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजना

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. अमपा २४०९/प्रक्र २६८ /नवि-२६
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक - ३१ ऑगस्ट, २००९

प्रस्तावना:-

अकोला शहराचे महत्व व वाढती गर्दी, वाहनांची वाढती संख्या व त्यामुळे सतत होणारी वहातूक कोंडी तसेच अकोला शहराची भविष्यकालीन गरज लक्षात घेऊन वाहतूक व्यवस्थेत मोठयाप्रमाणात सुधारणा करण्याची आवश्यकता भासत आहे. अकोला शहरासाठी एकात्मिक रस्ते विकास योजना राबविण्याच्यादृष्टीने अकोला महानगरपालिका व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी " बांधा, वापरा व हस्तांतरित करावा (B.O.T.) या तत्वावर " अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास कार्यक्रम " राबविण्यासंबंधी प्रस्ताव तयार केला. या कार्यक्रमाची आर्थिक सुसाध्यता तपासण्यासाठी महाराष्ट्र रस्ते विकास महामंडळ व अकोला महानगरपालिकेतर्फे मे. टेक्नो कन्सलटंट यांची सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. त्यांनी २००७-०८ च्या दरसूची आणि इतर अनिवार्य शुल्क विचारात घेऊन अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेसाठी प्रकल्प तयार केला. या प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात पथकर नाक्याशी संलग्न असलेले, मुख्य बाजार पेठेतील व जास्त वाहतुक वर्दळ असलेल्या १३ रस्त्यांची सुधारणा करण्याचा व २ नवीन पुल बांधकामाचा समावेश करण्यात आला आहे. अकोला शहरातील एकात्मिक रस्ते विकासाची योजना खाजगी विकसकामार्फत खुल्या स्पर्धात्मक निविदा मागवून " बांधा वापरा व हस्तांतरित करा " या तत्वावर राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. प्रस्तावावर विचारांती शासनाने अकोला शहरातील रस्त्यांच्या एकात्मिक विकासाबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

i) अकोला महानगरपालिका अंतर्गत परिसरात अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेंतर्गत सोबतच्या प्रपत्र "अ" मध्ये नमूद केलेल्या १३ रस्ते व २ पुलांच्या अंदाजे रु. ८५.७६ कोटी किंमतीचा प्रकल्प खाजगीकरणाच्या माध्यमातून " बांधा वापरा व हस्तांतरित करा " (B.O.T.)या तत्वावर राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

ii) हा प्रकल्प राबविण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाला **अमलबजावणी यंत्रणा** म्हणून घोषित करण्यात येत आहे. खाजगी विकासकाकडून खुल्या स्पर्धात्मक निविदा मागवून जास्तीत जास्त प्रिमियम देणा-या किंवा कमीत कमी "व्यवहार्यता फरक निधी" मागणा-या उद्योजकामार्फत प्रकल्पातील कामे करण्यात यावीत.

(कृ.मा.प.)

iii) हा प्रकल्प मुंबई मोटार वाहन कर अधिनियम १९५८ मधील कलम-२० नुसार सुनिश्चित क्षेत्रातील एक समूह ( CLUSTER SITUATED IN WELL-DEFINED ZONE ) म्हणून शासनातर्फे मंजूर करण्यात येत आहे.

iv) या प्रकल्पाकरीता संपूर्ण निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत हाताळण्यांत येईल. प्रकल्पात समाविष्ट असलेल्या कामांचे विस्तृत सर्वेक्षण, प्रकल्पास पर्यावरण विषयक "ना हरकत प्रमाणपत्र " आवश्यकतेनुसार मिळविणे, प्रकल्पाचा सुसाध्यता अहवाल तयार करणे , संबंधीत महानगरपालिका व संबंधीत संस्था इत्यादींचा ठराव प्राप्त करुन घेणे, प्रकल्पाची तांत्रिक, वाणिज्यिक व कायदेशीर जोखीम इत्यादी बाबींचा अभ्यास करणे, याबाबी सार्वजनिक बांधकाम विभागाने कराव्यात.

v) निविदा प्रक्रियेतून निश्चित करण्यात येणा-या उद्योजकाकडून प्राप्त होणारी प्रिमियमची रक्कम महानगरपालिकेला देय राहील. मात्र निविदेअंती "व्यवहार्यता फरक निधी" उद्योजकाला द्यावी लागल्यास सदर रक्कम अकोला, महानगरपालिका उपलब्ध करुन देईल. सदर प्रकल्प राबविण्यासाठी आवश्यकतेनुसार भुसंपादन करणे, अतिक्रमणे हटविणे व आवश्यकतेनुसार पुनर्वसनाचा खर्च करणे तसेच प्रकल्पाकरिता अतिक्रमण मुक्त जागा उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी महानगरपालिकेची राहील. तसेच, प्रकल्प राबविण्यासाठी अकोला महानगरपालिका सार्वजनिक बांधकाम विभागास नि:शुल्क सहकार्य करील.

vi) निविदा प्रक्रियेतून निश्चित करण्यात येणा-या उद्योजकास प्रपत्र "ब" मध्ये दर्शविण्यांत आलेल्या ठिकाणी पथकर स्थानके उभारुन सवलतीच्या कालावधीत प्रपत्र "क" मध्ये नमूद केलेल्या दराने प्रपत्र "ड" मधील नमूद करण्यांत आलेल्या सवलती देऊन पथकर वसूल करता येईल. मात्र, उद्योजकास प्रपत्र "इ" मध्ये नमूद करण्यांत आलेला वाहनांना पथकरातून सूट द्यावी लागेल. उद्योजकास सवलतीच्या कालावधीत पथकर वसूल करण्यास अडविले जाणार नाही याची अकोला महानगरपालिकेने खबरदारी घ्यावी.

vii) सवलतीच्या कालवधीमध्ये या कामांची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी संपूर्णपणे उद्योजकांची असेल. प्रकल्पातील रस्त्यांवर अथवा चौकांवर उद्योजकाकडून प्रकल्पांतर्गत उभारण्यात येणारे विद्युत खांब, हायमास्ट पोली अथवा सिग्नल इ. कामे पूर्ण होऊन त्यांचे प्रत्यक्ष संचालन सुरु झाल्यानंतर त्यावर येणा-या विद्युत देयकांचा भरणा पूर्तता अकोला महानगरपालिकेकडून करण्यांत येईल. दोष निवारण कालावधी संपल्यानंतर त्यांच्या देखभाल व दुरुस्तीची संपूर्ण जबाबदारी अकोला महानगरपालिकेची अकोला. सवलतीच्या कालावधीत उद्योजकाला करारनाम्यातील अटीनुसार प्रकल्पातील प्रस्तावित रस्त्यांवर उभारलेल्या विद्युत खांबावर व बस थांब्यावर जाहीरात देऊन त्यावरील उत्पन्न घेण्याचे आधिकार अकोला महानगरपालिकेचे असतील. प्रकल्पातर्गत सुधारणा करण्यात येणा-या रस्त्यांच्या दुतर्फा टाकण्यात येणा-या डक्ट म्हधुन ऑपटिक फायबर केबल्स टाकण्यात आल्यास त्याच्यापोटी मिळणारे उत्पन्न घेण्याचे अधिकार अकोला महानगरपालिकेस असतील.

viii) सवलतीचा कालावधी पूर्ण झाल्यावर प्रकल्पातर्गत विकसीत करण्यात आलेल्या अकोला महानगरपालिकेच्या अखत्यारितील रस्ते महानगरपालिकेकडे तर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील रस्ते सार्वजनिक बांधकाम विभागाकडे हस्तांतरित करण्यात येतील. हस्तांतरित करण्याच्या वेळी रस्ते सुस्थितीत राहतील ह्याची जबाबदारी उद्योजकाची असेल. तद्नंतर अशा हस्तांतरित करण्यात आलेल्या रस्त्यांची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी आप-आपल्या रस्त्यांच्या संदर्भात यथास्थिती महानगरपालिका / सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( का.तु.सातकर )
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री ( सार्वजनिक उपक्रम ), सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री, (उद्योग ) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री.( व्यापार व वाणिज्य) यांचे खाजगी सचिव
विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
जिल्हाधिकारी, अकोला.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
निवडनस्ती, नवि- २६

शासन निर्णय क्र. अमण २४०९/प्रक्र २६८ /नवि-२६, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ या सोबतचे

# "प्रपत्र - अ "

अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनाअंतर्गत करावयाची कामे.

| अ. क्र. | बाब | लांबी ( मी.) | (रुपये लाखांत ) कामाची किंमत |
|---|---|---|---|
| १ | रस्ता क्र.१ : खंडेलवाल भवन मिनी बायपास जंक्शन ते इन्कमटॅक्स चौक ते मलकापूर गावठाण पर्यन्त गौरक्षण मार्गाचे रुंदीकरण , मजबुतीकरण व सुधारणा करणे ( AK-१ ) | ३१५०.०० | ९२७.६६ |
| २ | रस्ता क्र.२ : अशोक वाटीका चौक ते हेड पोस्ट ऑफीस ते मदनलाल धिंग्रा चौक ते टावर चौक ते अग्रसेन चौक ते रेल्वे स्टेशन पर्यन्तच्या रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे (AK -२) | २१००.०० | ६४२.११ |
| ३ | रस्ता क्र.३ : मदनलाल धिंग्रा चौक ( नविन बसस्थानक ) ते चांदेकर चौक ( ओपन थिएटर चौक ) ते गांधी चौक ते सिटी कोतवाली पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे ( AK ३) | ८७०.०० | २८१.६१ |
| ४ | रस्ता क्र.४ : सिटीकोतवाली चौक ते मानेक टॉकीज ते अकोट स्टॅन्ड चौक ते राजकमलचौक ते शिवाजी कॉलेज ते रेल्वे ओव्हर ब्रिज पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे ( AK ४) | १,६३५.०० | ५९३.२७ |
| ५ | रस्ता क्र. ५ : सिटीकोतवाली ते जयहिंद चौक ते पौळा चौक ते भांडपूरा चौक ते बाळापूर मिनी बायपास ( राष्ट्रीय महामार्ग क्र.६ ) पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण,मजबूतीकरण व सुधारणा करणे (AK ५) | २३००.०० | ५२०.८३ |
| ६ | रस्ता क्र. ६ : सिंधी कॅम्प, खदानचौक ते कोलनखेड की रोड (नविन बायपास जंक्शन) पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण , मजबूतीकरन व सुधारणा करणे . (AK६) | ४११०.०० | ८६३.७९ |
| ७ | रस्ता क्र. ७ : चांदेकर चोक ( ओपन एअर थिएटर ) ते जुना वाशिम स्टॅन्ड चौक (काश्मिर लॉज ) ते दिपक चौक ते दामले चौक ( संतोषी माता मंदिर ) ते रेल्वे माल धक्का पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण , मजबूतीकरण व सुधारणा करणे (AK ७) | १६३०.०० | ४८९.७८ |
| ८ | रस्ता क्र.८ : अशोक वाटीका ते कलेक्टर ऑफीस ते महानगर पालिका ते चित्र टाकिज ( सिटी कोतवाली ) पर्यत रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे (AK ८) | १३९०.०० | ३६२.४२ |
| ९ | रस्ता क्र.९ लक्झरी बसस्थानक (मिनी बायपास) ते सरकारी बगिचा ते सिटी कोतवालीपर्यन्त व सुधारणा करणे (AK ९) | ११४०.०० | ३६१.१५ |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | रस्ता क्र.१० : अकोट रोड रेल्वे ओव्हर ब्रिज ते अकोट फैल चौक ( अकोट फैल पोलिस स्टेशन) ते मायक्रोव्हेव टावर पर्यंत रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे . (AK १०) | १,३२० | २२२.४ |
| ११ | रस्ता क्र.११ : जुना आपातापा ते खरप रोड पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे (AK ११) | ११०.०० | १४८.३० |
| १२ | रस्ता क्र. १२ : डाबकी रोड वरील कॅनॉल ( जकात नाका ) ते डाबकी रोड रेल्वे गेट ( शेगाव बायपास ) पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे . (AK १२) | १,४४० | २६४.८० |
| १३ | रस्ता क्र.१३ : पातुर रस्त्याअंतर्गत वाशिम जंक्शन (मिनी बायपास ) ते नवीन बायपास जंक्शन पर्यन्त रस्त्याचे रुंदीकरण, मजबुतीकरण व सुधारणा करणे .(AK १५ | २८२०.०० | २२६.३२ |
| १४ | उड्डाण पुल क्र.१ : मोर्णा नदीवर सरकारी बगीचा ते पोळा चौक पर्यन्त पूल व पोच रस्त्याचे बांधकाम करणे (B.R.१) | २००.०० | ५५०.०० |
| १५ | उड्डाण पुल क्र.२ : मोर्णा नदीवर गुलजार पुलाजवळ पुल व पोच रस्त्याचे बांधकाम करणे (B.R. ४) | २००.०० | ५५०.०० |
| १६ | रस्त्याचे दुतर्फीकरण व सौंदर्यीकरण | -- | ८१.[illegible] |
| १७ | पथकर नाके बांधणे | -- | ४१५ |
| १८ | सेंटेज चार्जेस ३ टक्के | -- | २२४.७४ |
| १९ | भाव वाढ चार्जेस ५ टक्के | -- | ३७४.[illegible] |
| २० | एम.एस.आर.डी.सी.चार्जेस ६ टक्के | -- | ४८५.४४ |
| | एकूण प्रकल्प किंमत | | ८,५७६.११ |

E:\s0nawane\UD26st26.lwp

**शासन निर्णय क्र. अमपा २४०९/प्रक्र २६८ /नवि-२६, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ यासोबतचे**

# "प्रपत्र - ब"

अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनाअंतर्गत स्थापन करावयाची पथकर स्थानके.

| अनु क्रमांक | पथकर स्थानके |
|---|---|
| १ | मंगरुळपीर रस्ता गृमा. क्र १९७ ( राष्ट्रीय महामार्गाच्या प्रस्तावित वळणमार्गाजवळ) कि.मी. ५२/२०० |
| २ | वाशिम रस्ता रा.मा.क्र. २०४ ( वाशिम व वाडेगाव रस्ता जंक्शनजवळ ) कि.मी. ७/१०० |
| ३ | मिनी बायपास ( होलसेल धान्य बाजाराजवळ ) कि.मी. २५१/६०० |
| ४ | बाळापूर रस्ता ( मिनी बायपास जंक्शनजवळ ) रा.म. क्र. ६ च्या कि.मी. २५२/६०० जवळ ) |
| ५ | शेगाव रस्ता ( गायगाव लेव्हल क्रॉसिंगजवळ आणि रा.म. क्र. १९७ च्या कि.मी. ४२/४०० नजिक व अनोखा हनुमान मंदिराजवळ ) |
| ६ | खरप आपातापा रस्ता .रा.मा. क्र २०० कि.मी. ०/००० ते १/५०० च्या दरम्यान. |
| ७ | आकोट रस्ता रा.मा. क्र. २०४ ( मायक्रोवेव्ह टॉवरजवळ ) कि.मी. १२१ /२००. |
| ८ | मलकापूर रस्ता प्रजिमा २३ कि.मी. ०/००० . |
| ९ | गुडधी रस्ता प्रजिमा-१२ ( उमरी लेव्हर क्रॉसिंगजवळ नारायण मते कॉम्प्लेक्स जवळ |

F:\s0nawane\UD26st26.lwp

शासन निर्णय क्र. अमपा २४०९/प्रक्र २६८ /नवि-२६, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ यासोबतचे

# "प्रपत्र -क"

अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनाअंतर्गत आकारावयाच्या पथकराचे दर.

| वर्ष | | पथकराचे दर रुपये | | | |
|---|---|---|---|---|---|
| पासून ( दिनांक ) | पर्यन्त ( दिनांक ) | हलकी मोटार (LMV) | हलकी व्यापारी वाहने (LMV) | बस / ट्रक | दोनपेक्षा अधीक आसांची वाहने ( LMV) |
| १/१/२०११ (पथकरास सुरुवात) | ३१/१२/२०११ | २० | २५ | ४५ | ५५ |
| १/१/२०१२ | ३१/१२/२०१४ | २० | ३० | ५५ | ६० |
| १/१/२०१५ | ३१/१२/२०१७ | २५ | ३५ | ६० | ७५ |
| १/१/२०१८ | ३१/१२/२०२० | ३० | ४५ | ७५ | ९० |
| १/१/२०२१ | ३१/१२/०२३ | ३५ | ५० | ८५ | १०५ |
| १/१/२०२४ | पथकर समाप्ती पर्यन्त | ४० | ६० | १०५ | १२५ |

शासन निर्णय क्र. असपा २४०९/प्रक्र २६८/नवि-२६, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ यासोबतचे

# "प्रपत्र - ड"

अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनाअंतर्गत द्यावयाची पथकरातील सवलती.

| अ.क्र. | सवलतीचा तपशील |
|---|---|
| १ | या योजनेतील एका पथकर स्थानकावरुन पथकर भरुन ६ तासाच्या आत याच योजनेतील इतर कोणत्याही पथकर स्थानकावरुन जर तेच वाहन गेले . तर त्यास पुन्हा पथकर आकारण्यात येणार नाही. ही सवलत दिवसातून एक वेळ घेता येईल. |
| २ | **वारंवार प्रवासासाठी**<br>(अ) एकाच पथकर स्थानकावर महिनाभर वारंवार जाण्यायेण्यासाठी - एकेरी दराच्या ५० पट<br>(ब) एकाच पथकर स्थानकावर महिनाभर वारंवार जाण्यायेण्यासाठी - एकेरी दराच्या ५० पट |

शासन निर्णय क्र. असपा २४०८/प्रक्र २६८ /नवि-२६, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९ यासोबतचे

# "प्रपत्र - इ "

अकोला शहर एकात्मिक रस्ते विकास योजनाअंतर्गत पथकरातून द्यावयाची सूट.

| अ.क्र. | पथकरातून सूट असलेल्या वाहनांचा तपशील. |
|---|---|
| १ | अति महत्वाच्या व्यक्तींची वाहने -मा.राष्ट्रपती, मा.उप राष्ट्रपती, राज्याचे मा.राज्यपाल व लाल दिवे असलेली लोकप्रतिनिधींचे वाहने |
| २ | भारतीय संरक्षण दलाची वाहने. |
| ३ | राज्यातील विद्यमान खासदार / आमदार प्रवास करीत असलेली वाहने. |
| ४ | टपाल व तार खाते - केंद्र व राज्य शासनाची वाहने |
| ५ | पोलीस / अग्निशमन दलाची वाहने |
| ६ | रुग्णवाहिका / शववाहिका |
| ७ | दुचाकी वाहने |
| ८ | वाहनचालक वगळून ३ आसनी प्रवासी रिक्षा |
| ९ | रिकाम्या ट्रॉलीसह ट्रॅक्टर |